**महाराष्ट्र शासन**

क्रमांक: बीयुडी.-१६२१/प्र.क्र.११८/२८-अ
सामान्य प्रशासन विभाग,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२
दिनांक : ०८ डिसेंबर, २०२१.

**विषय :- राज्यातील या विमानतळ/ धावपट्ट्यांच्या विकासासाठी लेखाशिर्ष (३०५३ ०१४६) खाली महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस निधी वितरीत करणेबाबत.**

वाचा :- १. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, मुंबई यांचे पत्र क्र. मविविकं/२०२१/वित्त व लेखा/ ३८९, दि.१५.०७.२०२१.

**शासन ज्ञापन :-**

लेखाशीर्ष ३०५३ ०१४६ खाली उपलब्ध राज्यातील या विमानतळ/ धावपट्ट्यांच्या विकासासाठी निधी उपलब्ध करुन देण्यात येतो. सदर लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी रु.१५.०० कोटी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. आतापर्यंत मूळ अर्थसंकल्पिय तरतुदीतून निधी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस उपलब्ध करुन देण्यात आला नाही.

२. आता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात लेखाशीर्ष ३०५३-०१४६ खाली राज्यातील या विमानतळ/ धावपट्ट्यांच्या विकासासाठी अर्थसंकल्पिय तरतुदीच्या मर्यादेत रु.४.५० कोटी इतका निधी वितरीत करण्यास वित्त विभागाने मान्यता दिलेली आहे. या अनुषंगाने राज्यातील या विमानतळ/ धावपट्ट्यांच्या विकासासाठी रु.४.५० कोटी निधी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस उपलब्ध करुन देण्यासाठी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरित करण्यात येत आहे.

**योजनेचे नाव - मागणी क्रमांक ए-७, ३०५३ नागरी विमानचालन, ०२ विमानतळ, १०२ विमानक्षेत्र, (००) (०१) विमानतळ/ धावपट्ट्या यांचा विकास (कार्यक्रम) (३०५३ ०१४६) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)**

| बाब क्र. | सन २०२१-२२ ची मूळ अर्थसंकल्पिय तरतूद | सन २०२१-२२ मध्ये वितरीत करण्यात आलेली रक्कम | वितरीत करावयाची रक्कम |
|---|---|---|---|
| विमानतळांच्या सुरक्षा, साफसफाई, दुरुस्ती तसेच देखभालीसाठीचा खर्च व कराड येथील विमानतळाच्या धावपट्टीचे नूतनीकरण(recarpenting) साठी लागणारा निधी | रु.१५.०० कोटी | -- | **रु.४.५० कोटी** |
| **एकूण** | **रु. १५.०० कोटी** | -- | **रु.४.५० कोटी** |

**(अक्षरी रक्कम रुपये चार कोटी पन्नास लक्ष फक्त)**

३. उपरोक्त खर्च " मागणी क्रमांक ए-७, ३०५३ नागरी विमानचालन, ०२ विमानतळ, १०२ विमानक्षेत्र, (००) (०१) विमानतळ/ धावपट्ट्या यांचा विकास (कार्यक्रम) (३०५३ ०१४६) (कार्यक्रम) (३०५३ ०१४६) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ करिता मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा. याबाबत उपसंचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

४. वितरीत करण्यात येत असलेला सदरहू निधी सशर्त असून ज्या विकासकामांसाठी वितरीत करण्यात आला आहे, त्याच कामांसाठी तो दि.३१ मार्च २०२२ पूर्वी खर्ची पडेल याची खबरदारी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीने घ्यावी. तसेच, वितरीत निधी PLA अथवा बँक खात्यात जमा न करता विहीत प्रयोजनातूनच खर्च होण्याची खातरजमा कंपनीने करावी व खर्च करण्यात आलेल्या निधीबाबत वेळोवेळी आढावा घेऊन विहीत कालावधीत खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

५. हे शासन ज्ञापन वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.६२३/२०२१/व्यय-४, दि.२९.११.२०२१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक क्र. २०२११२०८१७२८५६५७०७ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Mahesh Kisan Wavhal

Digitally signed by Mahesh Kisan Wavhal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a5f6330d58102c34226358d9eb88eeaac75f0fd9db44b648fc5f6dc90d3ca6a2, serialNumber=495c75b4c173c81f308bd63a1b33a5da4ea131ed182d44ea1b502ab4662e9810, cn=Mahesh Kisan Wavhal
Date: 2021.12.08 17:35:24 +05'30'

**(महेश वाव्हळ)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्या., मुंबई
२. संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई.
३. उपसंचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई.
४. महालेखापाल, ( लेखा परिक्षा)/ (लेखा अनुज्ञेयता ),महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षक, मुंबई.
७. कक्ष अधिकारी, कार्या-१४४३, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी, कार्या-व्यय ४, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कक्ष अधिकारी, कार्या-२५, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती.